॥ श्री ॥

श्री सहदेव मखामले आणि सहकारी मंडळ,
सप्रेम नमस्कार विनंति विशेष.

आपल्या वार्षिक सभेची ठराव-प्रत आणि समारंभाचें निमंत्रण, दोन्हीहि मिळाली. तुम्ही माझ्यासंबंधीं जो ठराव पास करून कार्यक्रम आखला, त्यामागची तुमची भावना, माझ्यासंबंधीं तुमच्या मनांतील आदर, जिव्हाळा, आपुलकी हे सर्व विचारांत घेतांहि मला यासंबंधी कसलीच पूर्व कल्पना न देतां तुम्ही हें सर्व नियोजन केलें त्यामुळें माझी अवस्था फार चमत्कारिक झाली आहे. याची जरी मला पुसटशी कल्पना दिली असती तरी या प्रकरणाची मी येथपर्यन्त वाटचाल होऊं दिली नसती. झालें तें झालें. मात्र आतां मला जें योग्य वाटतें तें मी करणार आहे. म्हणून त्यासंबंधीं थोड्या विस्ताराने लिहितो. माझ्या मनांत कांहीं शंका बऱ्याच दिवसापासून होत्या. आणि त्या खऱ्या असाव्यात असे आतां जाणवूं लागले आहे. माझ्यासंबंधीं तुम्हां मंडळींच्या दोन धारणा आहेत आणि त्या साफ चुकीच्या आहेत हे मला आतां आवर्जून सांगणें भाग आहे. मी एक बडा अभ्यासक, मोठा विद्वान आणि प्रतिष्ठित माणूस आहे असा तुमचा ग्रह झालेला दिसतो

आहे, ही एक आणि दुसरी अशी कीं, मी तुमच्या संस्थेचा हितचिंतक आणि फार मोठा आधार आहे वगैरे. या गोष्टी तुम्ही लोक मनांतून अगदी पुसून टाका. या चुकीच्या कल्पना मनांत घट्ट धरून बसाल तोंपर्यन्त तुम्ही कांहीं अपेक्षेनें यायचे आणि मी नकार देत राहायचा असे होत राहणार. हें बरे नव्हें. हे बंद व्हावयास हवे आहे. तुम्ही सगळे नवोदित आहांत, तरूण आहांत, माझ्यापेक्षां लहान आहांत. असे असतांहि माझ्या मनीं तुम्हां सर्वांविषयीं अपार आदर आहे. तुमची जर अशी अवहेला होत राहील तर या पातकाला मला कसलेहि प्राय:चित्त असणार नाही. म्हणून अत्यन्त स्पष्टपणें मी माझें मनोगत व्यक्त करणार आहें. मी एक सामान्य मनुष्य आहे—बेताबाती स्मरण–शक्तीचा, सुमार ज्ञानाचा आणि व्यवहाराचें आकलन अथवा ज्ञान नसलेला असा. हा माझा विनय नाही. मी खरेच सांगतो कीं, माझी स्वत:संबंधीची भावना धड नाही. ही अनेक वर्षांच्या अनुभवाने आकळलेली वस्तुस्थिती आहे. हें मी कमी-जास्त करून सांगत नाही. ‘‘ज्ञानं न पुरूषतन्त्रं किन्तु वस्तुतन्त्रम्।’’ हें आमच्या तत्त्व-प्रान्तांतील प्रमेय आहें. वस्तु जशी आहे तशीच पाहण्यास हवी. ज्ञान हें वस्तूच्या स्वरूपावर अवलंबून असतें, आपल्या लाडक्या इच्छेवर नव्हें. हा नियम अध्यात्म आणि व्यवहाराला, ज्ञान आणि विज्ञानाला, दोहोंनाहि सारखाच लागू आहे. याचा

अर्थ माझ्या मनीं न्यूनगंड आहे अथवा माझ्या मनांत कांहीं कमीपणाच्या भावनेनें घर केले आहे असे मला अद्यापपावेतों तरी वाटत नाही. उलट अत्रे यांच्या भाषेंत मी कधी कधी म्हणतो,''आम्ही कोण म्हणून काय पुसतां दाताड वेंगाडुनी'' मात्र ही खोल आंतरबैसका आहे. हें आंतलं व्यक्तित्त्व आहे कीं, जें कळिकाळालाहि भीक घालणार नाही. मग इतरांचा काय पाड! मात्र.....येथें आमचे घोडे पेंड खाते आहे, तट्टू अडून बसला आहे. सुखेनैव अडो. मी त्याचा सर्वभावें आणि आनंदाने स्वीकार केला आहे. याचा अर्थ असा कीं, साधे, दुबळे, बावळे, अव्यवहारी बाह्य व्यक्तित्त्व जसे आहे तसे नको का समजावून घ्यावयास? येथे विनयाचा प्रश्नच कोठे येतो? तें मला कळत नाही. सारांश असा कीं, अशा यःकश्चित सामान्य माणसाचा सत्कार योजून तुम्ही त्या बिच्याऱ्याची फजिती करणार. अर्थात् यांतून तुम्हां लोकांना काय लाभेल ते एक हरीच जाणे! यानंतर दुसरी गोष्ट म्हणजे मी तुमच्या संस्थेचा हितचिंतक असून तिचा फार मोठा आधार आहे अथवा होईन. ही तुमची फसगत आहे. आत्मवंचनेबाबत मी सदैव सावध राहत आलो आहे. म्हणून तुम्हासहि सांगू इच्छितो कीं, तुम्ही तुमची फसगत करून घेऊं नका. वस्तुस्थिती म्हणाल तर मी एक ध्येयवेडा प्राणी आहे. कदाचित् नुसताच वेडा असण्याचीहि शक्यता आहे, कुणी सांगावे? तेव्हां कांहीं का असेना मी

आहे हा असा आहे. तेव्हां ‘धावे जातीपाशीं जाती’ या तत्त्वानुसार पोटापाण्याचें जीवन जगणाऱ्या माणसापेक्षां अशी तुमच्यासारखी माणसे पाहिली कीं, मला त्यांच्याविषयीं अगदी अकारण आपुलकी वाटते. कुठेंतरी त्यांचें आपलें नातें आहें असें वाटूं लागतें. आणि यांतूनच मनांत विचार येऊं लागतात कीं, ही अशी विविध क्षेत्रांतील वेडी मंडळी व्यवहारी जीवनाच्या न्यायांत बसत नाहीत. व्यवहारी जग आपल्या उद्योगांत मग्न असतं, व्यग्र असतं. त्याला या माणसांची सुखदु:खं, अडीअडचणी, चिंता, काळज्या, कष्ट त्यांची होणारी ससेहोलपट यांची अगदीच अल्प जाणीव असल्याचे आजपावेतों अनेकांच्या अनुभवानें सिद्ध झालें आहें. उलट हें व्यवहारी जग त्यांना कित्येकवेळां मुळीच समजावून न घेतां त्यांचा फजितवाडा करतं. यांत मी कोणला दोष देत नाही.‘प्रकृतिं यान्ति भूतानि’या तत्त्वानुसार जो तो आपल्या स्वभावाप्रमाणें वागत असतो. याचा अर्थ घटना कशा घडतात तेवढेच मी सांगतो आहे. असो. अशा प्रकारे ही ध्येयवेडी मंडळी व्यवहाराचे चपेटे खात जीवनक्रम चालू ठेवतात.

“घायलकी व्यथ घायल जाने और न जाने कोयी” तसे, ही अशी ध्येयवेडी माणसे पाहिली कीं, माझें मन व्यथित होतें, व्याकूळ होतें. एकच उदाहरण देतो. संस्थेच्या प्रथम वर्धापन समारंभाच्या निमंत्रणासाठीं भर उन्हांत तुम्ही एकटेच वणवण फिरत होता आणि तें पाहून, मी खरेच

सांगतो माझें चित्त गलबललें. मग मात्र माझा मलाच संताप आला. ही माणसे धडपडतात, तडफडतात आणि आपल्याला कांहींच करायचे नाहीं कां? असा मी मनाशींच प्रश्न करून ‘पोटाला चिमटा बसल्याशिवाय कळत नाहीं’ तसे खिशाला चाट बसल्याशिवाय ही हि गोष्ट आपल्याला कळणार नाही. असे वाटून संस्थेचा वर्धापन दिन आहे आपण फुलाची पाकळी तरी देऊं, अशा अर्थी ते २००रू. मी दिले. तें दान अथवा देणगी नव्हें. देणगी देण्याएवढी माझी योग्यता आहे असे मला मुळीच वाटत नाही.

घरीं आलें धन। नावेमधें पाणी। टाकावे काढूनी। दो हातांनी।। सांचलें तें धन। परस्व जाणोनी। लावावें कारणीं। समाजाच्या।। ही माझी त्यामागची भावना आहे.

सारांश असा कीं, विविध क्षेत्रांतील अशा ध्येयवादी माणसांची सुखं दु:खं वाटून घेण्याचा, त्याचें ओझें आपल्या शक्तीनुरूप उचलण्याचा प्रयत्न करणें ही माझ्या हाडींमासीं खिळलेली वस्तू आहे. कित्येक वेळां माझ्या स्वार्थी वृत्तीमुळें माझ्याकडून यांत कुचराई होते. त्यावेळीं मला अतीव पश्चात्ताप होतो, पण वेळ निघून गेलेली असते आणि मी मात्र चरफडत बसतो. असें होतें.

‘चुकी भरूनी काढणें फिरूनी हें घडेना कधीं’
विनिष्ठुर असें भरें प्रकट तत्त्व चित्तामधीं
म्हणूनी अनिवार हें नयनवारी जें वाहतें
असे अहह! शक्त का कवणहि टिपायास तें

सूर्याचें प्रकाशणें अथवा कोकिळेचें कूजन हा धर्म त्यांच्या स्वभावगत आहे. सूर्यांतून प्रकाश काढला आणि कोकिळेंतून कूजन वजा केले तर त्यांचें अस्तित्व तरी उरेल का? तुम्ही माझ्या २०० रूपयांचा उल्लेख केला. ठीक आहे. मात्र मी तो तुमच्या मनाचा मोठेपणा मानतो. माझ्या दृष्टीने त्यांत कांहीं अर्थ नाही. माझ्याजवळ असते तर २००च काय २०००हि दिले असते. या गोष्टी माझ्या स्वभावगत आहेत. त्यामुळें त्यांत कर्तृत्व, मोठेपण पाहणें मला वेडगळपणाचे वाटते. एखादे वेळीं मुद्दाम फुशारकी मारूं म्हटले तरी मला कांहीं आधारच सापडत नाही.

आतां मुख्य विषय पुस्तकें. त्या संबंधीं सांगतो. मी १९५२ पासून आजतागायत अव्याहतपणें पुस्तकें विकत घेतो आहे. त्या दोन हजार पुस्तकांचा संग्रह—अर्थात् मोठ्या असल्या तरी केवळ दोनच खोल्यांत राहणाऱ्या माझ्यासारख्या गरीब माणसाच्या दृष्टीनें—इतका वाढला आहे कीं, बऱ्यापैकी मोठ्या जागेंतहि त्यांचा नुसता सुळसुळाट झाला आहे. वरतीखाली, इकडेतिकडे, चोहीकडे त्यांचेंच अधिराज्य माजलें आहें. आमची आई वैतागली आणि त्यांची व्यवस्था ठेवतांना मला पळता भुई थोडी झाली. शेवटी मी मन घट्ट केले आणि ठरवले कीं, निदान उठा-बसायला जागा राहील येवढी तरी पुस्तकें आतां हालवलीच पाहिजेत. तेव्हां विचार करूं लागलो हीं कोठे

द्यावीत, कोणाकडे ठेवावीत? पुष्कळसा शोध करतांहि याला योग्य वाली भेटेना. अशा विचारांत असतां एक दिवस संजीवनी मेडिकलचे प्रमोद म्हणाले, ‘‘तुम्ही येथील अथवा पुण्यांतील एखाद्या वाचनालयाला का देत नाही?’’ मी त्यांना म्हणालो, हे पहा प्रमोद, मी वेडाबागडा का असेना, एक अभ्यासक म्हणून आजपावेतों जगलो आहे. मी ही सगळी पुस्तकें अभ्यास, अध्ययन, कांहीं शोध, बोध या दृष्टीनेच जमविली आहेत. ही संपदा मला सोन्या चांदीपेक्षांहि मोलाची आहे आणि ही अशी संपदा आहे कीं, यांत मनोविनोदन अथवा करमणुकीचा भाग अगदी कमी आहे आणि दुसऱ्या दृष्टीने पहिल्यास तुम्ही कल्पाल त्यापेक्षांहि तो भरपूर आहे. पण तें एका संशोधकाचें मनोविनोदन असल्याचें तुमच्या प्रत्ययास येईल. गणित हा क्लिष्ट विषय मानला जातो पण एकदां का त्यांत पूर्ण प्रवेश झाला म्हणजे गणिताची कूटें सोडविणे हाच एक करमणुकीचा भाग होऊन बसतो. म्हणून विनोबांच्या एका विचार–स्फुटाचा माझ्या जीवनाशीं मेळ बसला. ‘‘गणितासारखे शास्त्र नाहीं, रसोईसारखी कला नाही आणि वेदान्तासारखा अनुभव नाही.’’ मी प्रमोदांना म्हणालो, ‘तुम्ही म्हणतां वाचनालयांना द्या. पण मी सांगतो कीं, धंदा–व्यवसाय करणाऱ्या या वाचनालयाला देण्याऐवजी मी ती इंद्रायणींत टाकून देईन. असो.

असे हें विचार–मंथन होत असतां एक दिवस मार्ग सापडला. तुम्हां लोकांचा आणि माझा परिचय तर पुष्कळ झाला होता. परंतु तुमच्या संस्थेसाठीं जागा, स्वतंत्र कार्यालय वगैरे कांहीं स्थायी स्वरूप डोळ्यांत ठसेलसे नसल्यामुळें पुस्तकासंबंधीचा हा विचार का कोण जाणे, मनाला शिवलाहि नाही. आतां तुम्ही दुसरी रूम घेतली. तुमचे कांहीं खटाटोप सुरूं झाले. आणि मग माझ्या मनांत एक एक विचार येऊं लागले.

या यंगस्टर्सना आपण बरेच दिवस पाहतो. असे धरून चालूं कीं, या मंडळींत छप्पन्न दोष असतील पण ही कांहीं एक ध्येयवेडी मंडळी आहेत. कांहीं धडपडताहेत, धावताहेत, पळताहेत, यांच्यांत एक झपाटलेपण आहे. हे माझ्याच जातीचे नव्हेत कां? एवढे मला पुरेसे नाहीं का? आणि माझ्या ध्यानीं आलें कीं, आहे हें भरपूर आहे. उलट ही मंडळी आपल्यापेक्षां कांकणभर सरसच आहेत. ‘‘कासया गुण–दोष पाहूं आणिकांचे । मज काय त्यांचे उणे असे ।।’’ मग मनाला बजावले कीं, बाबारे! हें जवळचें सुयोग्य ठिकाण सोडून सगळी दुनिया फिरत राहिलास तरी हातीं कांहींहि येणार नाही. शिवाय ‘जवळून दूर’ हें स्वदेशी धर्माचें सूत्र आहें असे गांधीजी म्हणत त्याचेहि यामुळें आपातत: पालन होते आहे तेव्हां कार्यासाठीं यासारखी सुसंधी नाही असा विचार करून

तुमच्यापाशीं पुस्तकासंबंधीं गोष्ट काढली. त्यावेळीं वाटले आपण आपली सोय पाहिली पण त्यांचा विचार केला का? ते होय म्हणतील का? हा उद्योग ते करतील कां? आपण त्यांना म्हणूं की तुम्ही संस्थेचें ग्रंथालय तयार करा पण हे आपल्याला तहान लागल्यावर दुसऱ्याला आड खांद म्हणून सांगण्यासारखे आहे. हे खरे आहे का? असे माझें मन मला खावूं लागले. कारण यापूर्वी मी पुष्कळांना विचारले पण ते ही बला गळ्यांत घेण्यास तयार होईनात. अर्थात् त्यावेळीं पुस्तकें केवळ ठेवण्याचा प्रश्न होता, देण्याचा नव्हता आणि जरी देण्याविषयीं बोलतो असतो तरी कांहीं फरक पडला नसता, हेहि त्यावेळींच ध्यानीं आले. तुमच्याकडे आलो त्यावेळीं मात्र मनाशीं ठरवूनच आलो कीं, सुयोग्य ठिकाण आहे पुस्तकें नुसती ठेवायची नाहीत तर देऊनच टाकायची. मी तुमच्याकडे आलो, तुमच्यापाशीं विषय काढला आणि आश्चर्य असें कीं, माझें काम झालें.

मी खरे सांगू! तुम्ही होय म्हणालात त्यावेळीं मी सुटकेचा निश्वास टाकला. मुलीचें लग्न नुसते ठरले तरी अन्न तुटलेला मुलीचा बाप दोन घास जास्त जेवतो तसें माझें झालें. नंतर तुम्ही हातगाडी आणून स्वत: पुस्तकें घेऊन गेलात. त्यांची यादी, व्यवस्था, कपाट वगैरे सर्व केले. हें सर्व थोड्या दिवसांत म्हणजे मुलीचें लग्न ठरेतोंवर तें कांहीं दिवसांतच होऊनहि गेले. मुलगी

चांगल्या घरीं जाऊन बसली. पित्याची चिंता दूर झाली. आतां यापुढे या दोन्ही सोयऱ्यांचे संबंध कसे राहतील? चांगलेच राहतील, कदाचित् राहणारहि नाहीत असे धरून चालूं पण मुलीच्या बापाला हेंच एक मोठे समाधान आहे कीं, मुलगी योग्य ठिकाणीं नांदते आहे आणि ती सुखासमाधानांत, आनंदांत आहे. यामुळें कोणत्याहि स्थितींत तो आतां आनंदांत, खुशींत असणार.

माझें भ्रातृसदृश सहदेवराव आणि तुमचे सहकारी, तुम्ही कांहींएक ध्येयवादी व्यक्ती आहांत. तुमची संस्था म्हणजे फायदा-तोटा पाहणारी सहकारी पतपेढी नाही. तुम्हां लोकांचें कष्ट, प्रामाणिकपण, शालीनता, घरच्या उद्योगांतील कितीतरी वेळ यासाठीं खर्च करता तो त्याग; या सर्वांचें फळ म्हणून हा ठेवा तुमच्या हातीं आला आहे. हीं पुस्तकें आपण होऊन वाट चालत तुमच्याकडे आली आहेत. मी देणारा कोणी टिकोजी नाही. हें तुमच्या पुण्याईचें फळ आहें. एक गोष्ट तुम्हास सांगतो कीं, मी कधी निवांत बसलो म्हणजे असे जाणवते कीं, या तळेगांवचें आणि माझें कांहीं ऋणानुबंध असावेत. येथें माझें मोठेसे हितसंबंध गुंतलें नाहींत तरीहि काय असेल तें असो ही भूमी सोडून दुसरीकडे जावे असे वाटतच नाही. या तळेगांवविषयीं अनेक लोक बोंबा मारतात मात्र एक माझें मूळ गांव बारामती सोडले तर मला तळेगांवशिवाय

कोठेहि आत्मीयता वाटत नाही. येथें आलो म्हणजे आपल्या घरीं यावे तसे वाटतें. मला वाटतें, माझीं पुस्तकें सुद्धा नक्की हेंच म्हणत असतील त्याशिवाय हा योग आला नाही. तीं म्हणत असतील, ‘‘तुम्ही येथें असतांनाच आम्हांस खरेदी केलेत म्हणजे जणूं आमचा येथें जन्म झाला. आम्ही येथेच राहिलो,वावरलो, फिरलो. आतां तुम्ही म्हणता, मी कंटाळलो आहे, थकलो आहे. तर ठीक आहे. आम्ही आतां तुम्हास त्रास देणार नाही पण आम्ही कांहीं हें गांव सोडणार नाही. तर तुमच्यासारखे किंबहुना तुमच्या पेक्षांहि सरस उत्साह, कर्तृत्व, धडाडी असणाऱ्या तरूणांच्या हातीं जाऊं. तशी आज तीं जाऊन बसली आहेत. त्यांचें सोनें झालें आहें. असो.

माझ्या पुस्तकांना तुम्ही सुयोग्य व्यक्ति भेटलात म्हणून मी तुमचे शतशः आभार मानायचे किंबहुना तसे ते मी मनोमनीं केव्हांच मानून बसलो आहे; आज ही गोष्ट नाइलाजाने व्यक्त करावी लागत आहे इतकेच. सत्कार तुमच्यासारख्या कष्ट, झीज सोसणाऱ्या व्यक्तीचा व्हावयास हवा. म्हणेतोंवर तुम्ही असे एकेक प्रकल्प उभे करता म्हणून तुमची पाठ थोपटण्यास हवी. हें माझें दान नव्हें, हा तुमचा मान आहे. तो सुद्धा मी देण्याचा प्रश्न नाही. तुम्ही तो लीलया पटकावला आहे. खरे सांगू, माझा हा भार माझ्यापेक्षांहि तुम्ही समर्थपणे पेललेला पाहून माझें हृदय कृतज्ञतेनें भरून आले आहे आणि माझी ही ग्रंथसंपदा

सुयोग्य ठिकाणीं सुयोग्य व्यक्तीच्या हातीं गेल्याबद्दल मला फार आनंद वाटतो आहे.

या सगळ्याचा सारांश तुम्हास थोडक्यांत सांगतो कीं, मी तुमच्यासाठीं कांहींहि केले नाही. मी स्वत: लहान होणार नाहीं आणि तुम्हांसहि लहान करणार नाही. आपण सगळे ‘‘अमृतस्य पुत्रा:’’ म्हणजे भारतासारख्या उंच हवेंतील उंच माणसे आहोत. आपण एकमेकांना कांहीं देणें म्हणजे आपल्याच पॅन्टच्या या खिशांतील त्या खिशांत ठेवावें इतकाच त्याचा अर्थ आहे.

तुम्ही ठरविलेला माझा सत्कार मला मानवणारा नाही आणि पेलणारा तर मुळीच नाही. तुमचें पहिलें निमंत्रण आल्यावर माझी अशी इच्छा होती कीं, तुमचा हा सर्व समारंभ डोळेभरून पहावा, थोरामोठ्यांची वक्तव्यें ऐकावी आणि समारंभ संपल्यानंतर केवळ उपचार म्हणून ‘‘ज्यांनी आम्हांस पुस्तकें दिली तीच ही व्यक्ति’’ असे म्हटल्यानंतर पाहुण्या वक्त्यांना हात जोडून नमस्कार करावा. बस् इतकेच, यापेक्षां जास्त कांहींहि असूं नये; पण तुमची दुसरी पत्रकें पाहिल्यावर वाटूं लागले कीं, मला पूर्व कल्पना न देतां तुम्ही हें जें नियोजन केलें तें कांहीं ठीक झालें नाहीं.

तेव्हां आतां एवढेच सूचित करतो कीं, तुमच्या या नियोजनानें या समारंभांतील एका सामान्य माणसाचा सगळाच आनंद हिरावून घेतला गेला आहे. मात्र याबद्दल

तुम्ही लोकांनीच उदार मनानें मला क्षमा करावी अशी हात जोडून विनवणी आहे.

*B. R. Thombre*

१३/७/१९८२

तुम्ही ज्या सद्भावानें माझा फोटो मागितला तो सद्भाव, ती सद्बुद्धि उत्तरोत्तर वृद्धिंगत होऊन तिला अमृत फळ प्राप्त होवो. माझ्या फोटोनें काय होते? पण फोटो त्यासाठीं निमित्त होत असेल तर तसे होवो.

“ दुर्लभ हे सद्बुद्धि । जिये परमात्माची अवधी ।
जैसा गंगेसी उदधी । निरंतर ।।”

संस्थापक
गो. नी. दांडेकर
सहदेव मखामले

# साहित्य कला आणि संस्कृतिमंडळ

*कार्यकारिणी* | तळेगांव दाभाडे

*अध्यक्ष*
*गो.नी. दांडेकर*
*उपाध्यक्ष*
*सौ. वर्षा किबे*
*कार्यवाह*
*सहदेव मखामले*
*संचालक*
*सौ.विमल लिमये*
*श्रीकांत पेंडसे*
*सौ.अंजली कुलकर्णी*
*कु.अलका कुलकर्णी*
*विलास पटवर्धन*
*सुरेश खळदे*
*पुरूषोत्तम डोळे*
*श्रीकृष्ण पानसे*
कार्यालय
७५४,सोमवार पेठ,

*"श्री"*

*आषाढ व।। ५ शके १९०४*

*मा.श्री. भास्करराव ठोंबरे,*

*सप्रेम नमस्कार*

आपण या संस्थेस विविध विषया-वरील विविध लेखकांची एकूण पुस्तकें ४७५ "देणगी म्हणून" दिल्याबद्दल संस्था आपली अत्यंत ऋणी आहे.

या पुस्तकांच्या सहाय्याने दिनांक १३/७/८२ रोजी सायंकाळीं ६.४० वाजतां मान्यवरांच्या उपस्थितींत ग्रंथालयाचें उद्घाटन होत आहे. त्याचप्रमाणे आपल्या उपरोक्त सहकार्याबद्दल प्रस्तुत मान्यवरांच्या उपस्थितींत श्री दत्त मंदिर येथें मा.श्री. गो.नी.दांडेकर यांच्या शुभहस्तें आपला सत्कार आयोजित केला आहे. तरी वरील सर्व कार्यक्रमास उपस्थित राहून संस्थेस उपकृत करावे ही विनंति.

